**सैन्यातील धारातीर्थी पडलेल्या महाराष्ट्रातील अधिकारी व जवान यांच्या विधवा/अवलंबितांना तसेच अपंगत्व प्राप्त झालेल्याअधिकारी/जवानांना आर्थिक मदत देण्याबाबत.**

***महाराष्ट्र शासन***

*सामान्य प्रशासन विभाग*

शासन निर्णय, क्रमांकःमासैम-२००९/३५४/(प्र.क्र.८१ /२००९)/२८

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :**- ०९ नोव्हेंबर, २००९.**

**वाचा :-** १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम-१०९९/१६६१/प्र.क्र.१२६/९९/२००९ दि. ४ऑक्टोबर२००९

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.संकीर्ण-२००२/प्र.क्र.५०/२००२/२८,दि.२३ मार्च,२००३.

३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैक-२००२/९३३/प्र.क्र.८६/२००२/२८, दि.९ डिसेंबर,२००३

४)शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रःमासैम-२००९/३५४/(प्र.क्र.८१ /२००९)/२८दिः.०७ मे,२००९. ५जून २००९,व २४ सप्टेंबर,२००९.

**शासन निर्णयः-**

संदर्भाधीन अ.क्र.(१) येथील शासन निर्णयाद्वारे जम्मू-काश्मिर मधील नियंत्रण रेषेजवळील क्षेत्रात तसेच देशातंर्गत भागात मे, १९९९ पासू निर्माण झालेल्या युध्दजन्य तणावाच्या परिस्थितीत चकमकीत/मोहिमेअंतर्गत धारातीर्थी पडलेल्या सैन्यदलातील महाराष्ट्र राज्यातील सैनिकांच्या विधवांना/अवलंबितांना प्रत्येकी रुपये ५.०० लाख प्रमाणे एकवेळची आर्थिक मदत देण्याबाबत त्याचप्रमाणे गंभीररित्या जखमी होऊन अपंगत्व आलेल्यांना त्यांच्या अपंगत्वाच्या प्रमाणाासार रु.१.०० व रु.३.०० लाख आर्थिक मदत देण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. या आर्थिक मदतीपैकी संदर्भाधीन अ.क्र.(१) व (३) येथील शासन निर्णय दि.४.१०.२००० व दि.०९.१२.२००३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे द्यावयाच्या आर्थिक मदतीपैकी ४०% रक्कम शासकीय अनुदानातून व उर्वरित ६०% रक्कम मुख्यमंत्री सहाय्यता (कारगिल) निधीतून घेण्यात आलेल्या व राष्ट्रीयीकृत बँकेत गुंतविण्यात आलेल्या रु.२२.२२ कोटी इतक्या रक्कमेच्या व्याजातून देण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. त्यानुसार संदर्भाधीन शासन निर्णयांनुसार युध्दात /चकमकीत शहिद/अपंगत्व प्राप्त झालेल्या जवानांच्या अवलंबितांना आर्थिक मदत देण्यास शासन मान्यता देत आहे.

**अ) धारातीर्थी पडलेले जवान (रुपये ५.०० लाख प्रमाणे एक वेळची आर्थिक मदत)**

| अ. क्र | नाव | मृत्यू दिनांक/मोहिम | वारसाचे नाव व आर्थिक मदतीची रक्कम |
|---|---|---|---|
| **१** | **कै. संजय आण्णासाहेब भाकरे, १५१३४००४ के, १ पॅरा (स्पेशल फोर्स), हवालदार.** | **२३.०३.२००९ ऑपरेशन रक्षक (जम्मू-काश्मिर)** | **१) श्रीमती सारीका संजय भाकरे (वीरपत्नी) - रु.३.०० लाख, वैद्य कॉलनी,जामखेड रोड, पो.भिंगार, जिल्हा अहमदनगर.<br>२) सौ. शहाबाई आण्णासाहेब भाकरे, (वीरमाता) - रु.१.०० लाख,<br>३) श्री. आण्णासाहेब कुंडलीकराव भाकरे, (वीरपिता) - रु.१.०० लाख<br>मु.पो.पाटोदा, ता.पाटोदा, जिल्हा -बीड.** |
| **२** | **कै. गोविंदसिंग विठ्ठलसिंग राठौड ९३१२७३३५६, १११, बटालियन सी.आर.पी.एफ. (छत्तीसगढ) कॉस्टेबल** | **१८.०२.२००९ कॉऊटर इन्सरजेन्सी ऑपरेशन (छत्तीसगढ)** | **१) श्रीमती अनिंता गोविंदसिंग राठौड, (वीरपत्नी) - रु.३.०० लाख.<br>२) सौ.सैजाबाई विठ्ठलसिंग राठौड (वीरमाता) - रु.१.०० लाख.<br>३)श्री.विठ्ठलसिंग राठौड, (वीरपिता) - रु.१.०० लाख ,<br>मु.पो.मुदखेड, (कृष्णानगर),ता.मुदखेड, जि. नांदेड** |

**ब) गंभीररित्या जखमी होऊन अपंगत्व प्राप्त झालेले जवान -**

| अ.क्र | नाव व पत्ता | मोहिम, दिनांक व अपंगत्वाचे प्रमाण | दिनांक ४.१०.२००० च्या शासन निर्णयानुसार अनुज्ञेय रक्कम |
|---|---|---|---|
| १ | शिपाई मुकेशकुमार चुन्नीलाल चौरागडे,<br>नं. २८०५५४१ वाय,<br>९ मराठा लाईट ईन्फैन्ट्री,<br>मु.पो.दवनीवाडा, ता.व जि.-गोंदिया. | ०९.०१.२००८<br>ऑपरेशन रक्षक<br>(जम्मू-काश्मिर)<br>३० टक्के | रुपये १,००,०००/- |
| २ | श्री. भारत जयसिंग पाटील,<br>नं. २७८९४४५ एक्स,<br>२१ पॅरा (एस एफ)<br>मु.पो.-कौलगे, ता. कागल, जि.- कोल्हापूर | २०/११/२००७<br>ऑपरेशन हिफाजत<br>(मणिपूर)<br>४० टक्के | रुपये १,००,०००/- |
| ३. | श्री सुनिल रामचंद्र भोसले. कॉन्स्टेबल,<br>नं.९१३२२४२०५,<br>९६,बटालीयन,सी.आर.पी.एफ.<br>मु.पो.शिरगाव,ता.खेड,जि.-रत्नागिरी. | ०४/११/२००१<br>कॉऊंटर इन्सरजेन्सी ऑपरेशन<br>(आसाम)<br>१०० टक्के | रुपये ३,००,०००/- |

२. वरील परिच्छेद क्र.(१) मधील गंभीररित्या जखमी होऊन अपंगत्व प्राप्त झालेले जवानांना आणि धारातीर्थी पडलेल्या जवानांच्या अवलंबिताना द्यावयाची आर्थिक मदत रु.१५,००,०००/- (रुपये पंधरा लाख फक्त) इतक्या रक्कमेपैकी ४०% रक्कम रु.६,००,०००/- (रुपये सहा लाख फक्त) शासकीय अनुदानातून तर उर्वरीत ६०% रक्कम रु.९,००,०००/- (रुपये नऊ लाख फक्त) मुख्यमंत्री सहायता (कारगिल) निधीतून घेण्यात आलेल्या व राष्ट्रीयकृत बँकेत गुंतविण्यात आलेल्या रु.२२.२२ कोटी रक्कमेच्या व्याजातून द्यावयाची आहे.

३. उपरोक्त परिच्छेद क्र.(२) मधील प्रयोजार्थ होणारा रु.४,८०,०००/- (रुपये चार लाख ऐंशी हजार फक्त) इतका खर्च मागणी क्र.ए-५ लेखाशीर्ष " २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०-इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, १०२-सामाजिक सुरक्षा योजने खाली निवृत्तीवेतन -(००)(०४) देशांतर्गत सुरक्षासंबंधी मोहिमेत/चकमकीत धारातीर्थी पडलेल्या सैन्यातील जवानांच्या विधवांना/अवलंबितांना आर्थिक मदत (२२३५-२६०-८)" याखाली सन २००९-२०१० या वित्तीय वर्षाकरीता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. तसेच शहीद जवानांच्या कुटुंबीयांना द्यावयाची आर्थिक मदत संबंधित जिल्हयांच्या जिल्हाधिका-यांच्या हस्ते देण्यात यावी.

४. याबाबत संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांनी संबधित पुरस्कारार्थ्यांना सदरहू रक्कम लाभार्थ्यांची पात्रता काळजीपूर्वक तपासून विहीत मुदतीत देण्याच्या सूचना त्यांच्या अधिनस्त असलेल्या क्षेत्रीय अधिका-यांना द्याव्यात व तत्संबंधीचा अहवाल तात्काळ शासनास पाठवावा.

५.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासाच्या **www.maharashtra.gov.in** या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. **२००९११०९१२४१३२००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-
**( अ. द. जोशी)**
**अवर सचिव महाराष्ट्र शासन**

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.मंत्री (मासैक),
मा.राज्यमंत्री (मासैक),
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई, (शाखा -ड-५/ड-६) २० प्रती
महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
महालेखापाल (लेखा व आुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर,
कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई - ४०० ००५,
जिल्हाधिकारी,  कोल्हापूर, रत्नागिरी, नांडेड, गोंदिया, बीड,
जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, पुणे,
संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे - ४११००६, (५ प्रती)
जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, कोल्हापूर, रत्नागिरी, नांडेड, गोंदिया, बीड,
सह संचालक, लेखा व कोषागार,संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन,मुंबई - ३२,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
वित्त विभाग (व्यय-४,) मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
सामान्य प्रशासन विभाग/कार्या-२५,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
निवड नस्ती (२ प्रती).